माजी सैनिकांना शासन सेवेत वर्ग ३ व
वर्ग ४ च्या पदावर नियुक्तीसाठी सवलती.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक:- आरटीए-१०८२/२३२७/सीआर-६३/१६-अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक:- ५ ऑक्टोबर, १९८९.

वाचा:- १] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-आयपीई-आरटीए-१०८०/०/१८१/१६-अ, दिनांक १० ऑक्टोबर, १९८०.
२] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-आरटीए-१०७९/०/४८२/१६-अ, दिनांक १६ एप्रिल, १९८१.

शासन निर्णय:-

शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:-आरटीए-१०७९/०/४८२/१६-अ, दिनांक १६.४.१९८१ मधील परिच्छेद २ [चार ] [ II ] नुसार माजी सैनिकांना शासन सेवेत वर्ग ३ व वर्ग-४ मधील राखीव पदावर नियुक्तीसाठी काही शैक्षणिक सवलती देण्यात आल्या आहेत.

२. केंद्र शासनाने माजी सैनिकांना सेवा भरतीसाठी नव्याने काही शैक्षणिक सवलती जाहीर केल्या आहेत, त्या धर्तीवर राज्यातील शासकीय विभाग व कार्यालयान्तर्गत तृतीय व चतुर्थ श्रेणीतील माजी सैनिकांसाठी असलेल्या १५% राखीव पदावर नियुक्तीसाठी सवलती देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता, त्यावर विचार करून शासन आता असे आदेश देत आहे की,

[अ] १५ वर्षे सैनिकीसेवा झालेले माजी सैनिक, जे एस.एस.सी. उत्तीर्ण असतील किंवा "इंडियन आर्मी स्पेशल सर्टिफिकेट ऑफ एज्युकेशन" अथवा तत्सम प्रमाणपत्र धारक असतील, तर ज्या पदासाठी पदवी परीक्षा ही पात्रता आवश्यक आहे आणि जेथे तांत्रिक अथवा व्यवसायिक कामाचा अनुभव आवश्यक ठरविलेला नाही, अशा पदावर त्यांची सदरची शैक्षणिक पात्रता शिथिल करून नेमणुकीसाठी विचार करावयास हरकत नाही.

[आ] १५ वर्षे सैनिकी सेवा झालेले माजी सैनिक, जर इयत्ता ८ वी उत्तीर्ण असतील किंवा "इंडियन आर्मी फस्ट क्लास सर्टिफिकेट ऑफ एज्युकेशन" अथवा तत्सम प्रमाणपत्र धारक असतील, तर ज्या पदासाठी माध्यमिक शालान्त प्रमाणपत्र परीक्षा ही पात्रता आवश्यक आहे अशा पदावर त्यांची सदरची शैक्षणिक पात्रता शिथिल करून नेमणुकीसाठी विचार करावयास हरकत नाही.

कृ.मा.प.

३. सर्व मंत्रालयीन विभाग तसेच त्यांच्या अधिपत्याखालील विविध विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख यांनी माजी सैनिकांना नेमणुका देताना वरील निर्णय विचारात घ्यावा. मंत्रालयीन विभागांनी हे आदेश त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील संबंधित शासकीय उपक्रम, महामंडळे, औद्योगिक संस्था, जिल्हा परिषदा, महापालिका इत्यादींच्या निदर्शनास आणावेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
विशेष कार्य अधिकारी, मुख्यमंत्र्यांचे कार्यालय,
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
प्रबंधक, मूळ न्यायशाखा, उच्च न्यायालय [पत्राने],
प्रबंधक, उच्च न्यायालय, [अपील शाखा], मुंबई [पत्राने],
प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय, महाराष्ट्र, मुंबई [पत्राने],
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई [पत्राने],
सचिव, सर्व प्रादेशिक निवड मंडळे,
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई ,[पत्राने],
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
मंत्रालयातील सर्व विभाग,
सचिव, महाराष्ट्र राज्य सैनिक मंडळ, पुणे,
सेवायोजन संचालनालय, मुंबई,
माहिती व जनसंपर्क महासंचालक, मुंबई [प्रसिध्दीपत्रक निर्गमितीसाठी]
महसूल व वन विभाग/ ग्राम विकास विभाग / शिक्षण व सेवायोजन विभाग/
नगर विकास विभाग/ सार्वजनिक आरोग्य विभाग/ वित्त विभाग,
मंत्रालयीन विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख,
महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल [लेखा परीक्षा], महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र-२, नागपूर,
महालेखापाल [लेखा परीक्षा] महाराष्ट्र-२, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
सामान्य प्रशासन विभाग/ कार्यासन क्रमांक- १२, १३-अ, १४, १४-अ, १६-ब,
निवड नस्ती.